**मौ. चंद्रे, ता.राधानगरी, जि. कोल्हापूर येथील भोगावती नदीकाठी पूर सरंक्षक भिंतीच्या कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०२२/ (प्र.क्र. ३३०/२०२२)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५ मार्च २०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७ ऑगस्ट, १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.(म) दि.३१.८.२०१९

**प्रस्तावना :-**

कोल्हापूर जिल्हयातील दुधगंगा नदीवर मौजे चंद्रे, ता. राधानगरी येथे वसलेले आहे. दरवर्षी पावसाळी हंगामात दूधगंगा धरणाचे दरवाजे उघडतात व नदीपात्रात विसर्ग सुरु होतो. तसेच धरणाच्या खालील भागात मोठया प्रमाणात पाऊस होत असल्याने पंचगंगा व भोगावती नदीस पुर येतो.

मौजे चंद्रे, ता. राधानगरी, जि. कोल्हापूर हे गाव दूधगंगा धरणापासून सुमारे २८ किमी खाली असल्याने मुक्त पाणलोट क्षेत्रातून विसर्ग येतो त्यामुळे नदीकाठास हानी होत असल्याने सदर ठिकाणी पूर संरक्षक कामाची आवश्यक्ता आहे. पूराच्या पाण्यापासून नदीकाठाचे रक्षण स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी मागणी केलेली आहे.

त्यानुसार मौजे चंद्रे, ता. राधानगरी,जि. कोल्हापूर येथे प्रस्तावित ठिकाणी पूरसंरक्षक भिंतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर मौजे चंद्रे, ता. राधानगरी, जि. कोल्हापूर येथील भोगावती नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौजेसिरसे, ता. राधानगरी, जि. कोल्हापूर येथील भोगावती नदीवरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. **४९७४४९७.००/-** (एकोणपन्नास लक्ष चौऱ्याहत्तर हजार चारशे सत्यानऊ

रुपये) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म) दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य(कामे), दि.२१/९/१९८९ व दि. ०३/०५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी. पूररेषा आखणी केल्याशिवाय कामे हाती घेण्यात येवू नयेत.

क) मुख्य अभियंता यांची निरिक्षण करुन निरिक्षण टिपणी निर्गमित करावे व तद्नंतरच तांत्रिक मान्यता दयावी.

ड) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी. कामाचे संकल्पन सक्षम स्तरावरुन मान्यता घेऊनच तांत्रिक मान्यतेची कार्यवाही करण्यात यावी. सदर संकल्पनामुळे कामाच्या किंमतीत अथवा कार्यकक्षेत बदल होत असल्यास त्यास सक्षम स्तरावर मान्यता घेणे अनिवार्य राहील.

इ) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

ई) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

प) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

फ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे सरवडे, ता. राधानगरी, जि. कोल्हापूर येथील भोगावती नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास कोल्हापूर जिल्हा परिषद, कोल्हापूर ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र प्राप्त करून घेण्याची जबाबदारी सक्षम अधिका-यांची असेल.

भ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

न) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयातील अटींचे कोटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. १५ / सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१६१५४९५९४७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 16:24:35 +05'30'

**( सोनल गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मलबार हिल, मुंबई

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

६) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

८) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

९) अपर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,

१४) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे

१५) आंतरवित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.३३०/२०२२)/ सिंव्य (महसूल),**

**दि. १५ मार्च २०२४ चे सहपत्र**

**परिशिष्ट**

| Sr. No. | Description of Item | Amount |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 3808921.46 |
| 2 | Royalty | 327613.05 |
| 3 | 1 % Insurance | 38089.21 |
| 4 | 18 % GST | 685605.86 |
| 5 | Add 3 % Contingencies | 114267.64 |
| | **Total Rs.** | **4974497.00** |

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 16:24:53 +05'30'

**(सोनल गायकवाड)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन